महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर यांना सन २०२५-२६ मधील ठोक रक्कम वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक : संकीर्ण-२०२३/ई-९२४५१६/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ९ जून, २०२५.

**ज्ञापन** :-

कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.एमएनएलयुसीएस/एडीएमएन/२०२५/३७३, दि.१७.०४.२०२५ अन्वये केलेल्या विनंतीनुसार महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर यांना पहिल्या हफ्त्यातील एप्रिल, २०२५ ते जून, २०२५ या कालावधीतील एकूण रु.५,२५,००,०००/- (रुपये पाच कोटी पंचवीस लक्ष फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

(१) महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर यांना वरीलप्रमाणे शासनाकडून मंजूर झालेली ठोक रक्कम ही विद्यापीठ निधीत जमा करुन सदर अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर रक्कमेतून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन व त्यास विद्यापीठाच्या वित्त समितीच्या मान्यतेने खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही संबंधित महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठांच्या कुलसचिव यांनी करावी.

(२) शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ ठोक रक्कम मंजूर करण्यात आलेली आहे, ही रक्कम त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आली आहे, हे पाहण्याची जबाबदारी विधी विद्यापीठांच्या कुलसचिव यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची तसेच वित्त समितीची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व तपशीलवार खर्चाची माहिती उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास विहित वेळेत सादर करावी. त्याशिवाय पुढील टप्प्यातील निधी विधी विद्यापीठांना वितरीत करण्यात येणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

(३) वरील ठोक रक्कमेची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विधी विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

२. सदरहू मंजूर झालेली तरतूद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर विद्यापीठास तातडीने उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२०२६ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची घालण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२५, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. दि.०७.०४.२०२५ रोजीच्या परिपत्रकातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने (अनौपचारिक संदर्भ क्र.६२९/२०२५/व्यय-५, दि.२७.०५.२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०६०९१४५०११०८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.06.09 14:51:14 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३. मा.कुलपती, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर.
९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.